**सन २०१८-२०१९ अर्थसंकल्पीय अनुदान मागणी क्र. जे-५, ७६१०- शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज - (२०१)(००)(०१) घरबांधणी अग्रिम.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः घबाअ - १२१८/(४)/प्र.क्र. २७ /पाच,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : १४ नोव्हेंबर २०१८

**संदर्भ :**

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः - एचबीए१०८०/सीआर ४९२/जीईएन ५,दि. १.१.१९८१

२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः - अग्रिम १०९६/प्र.क्र.२६/९६/विनयिम, दि. १५.१०.१९९६

३) शासन परिपत्रक क्रमांकः - घबांअ१००१/९५(२)/का.पाच, दि. २३.०२.२००१

४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक -घबांअ २०१२/प्र. क्र. ३०/२०१२/विनियम, दि. २०.०२.२०१५

५) शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग क्रमांक-घबांअ २०१२/प्र.क्र.३०/२०१२/विनियम,दि.२९.०२.२०१६

६) शासन ज्ञापन विधि व न्याय विभाग क्र. अनुदा-२२१८/(प्र.क्र.१५/१८)/का.२३, दि.०३ .०४.२०१८

**शासन निर्णय :-**

मागणी क्र. जे-५, ७६१०- शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज (२०१)(००)(०१)- घरबांधणी अग्रिम, (७६१० ०४७२) (योजनेतर/दत्तमत) या लेखाशीर्षाखालील सन २०१८-१९ या वर्षाकरिता मंजूर लेखानुदानातून, यादी क्रमांकः "१,२,३व ४" मध्ये दर्शविलेल्या कर्मचा-यांना घरबांधणी अग्रिम या प्रयोजनासाठी सोबतच्या विवरणपत्र "अ" मधील रकाना क्र. ३ येथील नियंत्रक अधिकारी यांना रकाना ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण **रु. २,०२,२९,५९७/- (रुपये दाने कोटी दोन लाख एकोणतीस हजार पाचशे सत्यान्नव फक्त )** इतका निधी खालील अटींच्या अधीन राहून प्रमाणित करण्यास शासन मंजुरी देत आहे.

**अटी आणि शर्ती :-**

१. हा निधी, वित्त विभाग शासन निर्णय क्र. घबांअ१०९९/प्र.क्र.२/९९/विनियम, दि. ८.७.१९९९ व शासन निर्णय वित्त विभाग क्र. घबांअ१०८८/(१५५)/विनियम, दि. ६.११.१९९०, शासन निर्णय वित्त विभाग क्र.घबांअ१०११/प्र.क्र.५६/२०११ / विनियम, दि.२७.२.२०१२ व शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक घबांअ २०.१२/प्र. क्र. ३०/२०१२/विनियम, दि. २०.२.२०१५ तसेच मुंबई वित्तीय नियम, १९५९, नियम १३४, परिशिष्ट २६ मधील विहित नियम/अटींचे काटेकोरपणे पालन करुन व त्याच्या अधीन राहून निधी वितरीत करण्याची दक्षता संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी. त्याचप्रमाणे प्रमाणित अग्रिमाच्या रकमेचे वितरण आदेश पारित करतांना संबंधित नियंत्रक अधिकाऱ्याने वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णय व नियमावलीतील तरतुदींच्या अनुषंगाने प्रस्तावाची परिपूर्ण छाननी करुन मगच रक्कम आहरीत करावी, व त्यानुषंगाने याबाबत कोणतेही न्यायीक प्रकरण उद्भवल्यास त्यास नियंत्रक अधिकारी जबाबदार राहतील.

२. प्रमाणित अग्रिम संबंधित अर्जदारास वितरीत करण्यापूर्वी व प्रकरणपरत्वे अर्जदाराने सर्व बाबींची/कागदपत्रांची पूर्तता केलेली आहे व ते स्थायी असल्याची पूर्ण खात्री करुन घेतल्यावरच अग्रिमास मंजुरी देण्यात यावी. तसेच अर्जदार सेवानिवृत्त होण्यापुर्वी त्याच्याकडून मंजूर करण्यात आलेल्या संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसुली होईल हे संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी पहावे.

३. अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वित्तीय वर्षाचे अनुदान उपलब्ध असेपर्यंत या अग्रिमास मंजुरी देऊन अग्रिमाची रक्कम कोषागारातून काढण्यात यावी. तसेच कोषागारातून रक्कम काढल्यानंतर ती रक्कम तीन दिवसाच्या आत संबंधित अर्जदाराला देण्यात यावी.

४. घरबांधणी (Under construction) प्रयोजनार्थ अग्रिम घेतले आहे अशा प्रकरणी अर्जदाराच्या घराचे बांधकाम विहित टप्प्यापर्यन्त पूर्ण केले आहे, याची खातरजमा नियंत्रक अधिकारी यांनी करावी व तद्नंतरच दुसऱ्या व तिसऱ्या टप्पासाठी शासनास प्रस्ताव सादर करावा. ज्या अर्जदाराना ३ रा हप्ता/अंतिम हप्ता प्रमाणित करण्यात आला आहे, त्या अर्जदारांकडून नियमानुसार आवश्यक त्या संपूर्ण कागदपत्रांची पूर्तता करुन घेऊन नंतरच प्रत्यक्ष रक्कम प्रदान करावी.

५. "जमीन खरेदी करुन घर बांधणे" या प्रयोजनासाठी अग्रिमाचा पहिला हप्ता मंजूर केल्यानंतर दुसरा हप्ता मंजूर करण्याची शिफारस करण्यापूर्वी अर्जदाराच्या घराचे मंजूर आराखडे, स्थानिक प्राधिकरणाच्या मंजुरी आदेशाची प्रत व मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र बी-१ मध्ये अर्जदाराने भरुन दिलेल्या नोंदणीकृत गहाण खताची प्रत नियंत्रक अधिका-यांनी त्यांच्या अभिलेखात जतन करुन ठेवावी. घरबांधणी या प्रयोजनासाठी या ज्ञापनानुसार प्रमाणित करण्यात आलेल्या अग्रिम धनास प्रत्यक्ष मंजुरी देण्यापूर्वी अर्जदाराने मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र बी-२ मध्ये भरुन दिलेल्या गहाण खताची प्रत नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांच्या अभिलेखात जतन करुन ठेवावी. ज्या अर्जदारांना हप्त्याने अग्रिम प्रमाणित करण्यात आले आहे, अशा अर्जदारांकडून त्यांना मिळालेल्या अग्रिमाची वसुली, त्यावरील व्याजाची वसुली मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील तरतूदीनुसार प्रकरणपरत्वे करण्यात यावी.

६. " तयार घर खरेदी" या प्रयोजनासाठी अग्रिम प्रमाणित करण्यात आलेल्या अर्जदारांकडून मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र ए-२ मध्ये करारनाम्याची प्रत भरुन घेण्यात आल्यावरच अग्रिमाची रक्कम प्रत्यक्षात अदा करण्यात यावी. तयार घर खरेदी (जुने अथवा नवे) या प्रयोजनासाठी अर्जदारास शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक घबांअ १०८७/(४६५)/विनियम, दिनांक ६.११.१९९० मधील विशिष्ट अटींच्या अधीन राहून व त्यामध्ये नमूद केलेली कागदपत्रे सादर केलेली आहेत, याची खात्री झाल्यावरच अग्रिम मंजूर करण्यात यावा. तसेच नियंत्रक अधिकारी यांनी जुने तयार घर/नवीन तयार घर याबाबत अधिकारी/कर्मचारी यांचेकडून खरेदीचे करारपत्र स्विकारताना ते योग्य ते मुद्रांक शुल्क (Stamp Duty) भरुन दुय्यम निबंधक, महसूल व वन विभाग यांच्याकडे संबंधितांकडून नोंदणी (Registration) केले असल्याबाबतची शहानिशा करावी.

७. "घरखरेदीसाठी/घरबांधणीसाठी वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड" या प्रयोजनासाठी अग्रिम प्रमाणित करण्यात आले आहे, अशा अर्जदारांकडून अग्रिम मंजुरी पूर्वी त्यांच्या कर्ज व शिलकीबाबतचे संबंधित वित्तीय संस्थेने दिलेले अलीकडील प्रमाणपत्र घेऊन त्याप्रमाणे प्रत्यक्ष शिल्लक कर्जाइतकेच अग्रिम मंजूर करावे.

८. जर काही कारणास्तव अग्रिम मंजूर करण्यात येत नसेल तर तसे शासनास त्वरीत कळविण्यात यावे. तसेच प्रमाणित अग्रिमापेक्षा कमी रक्कम मंजूर करण्यात येत असेल तर तसेही समुचित तपशीलासह तात्काळ कळविण्यात यावे व प्रमाणित अग्रिमाची उर्वरित रक्कम या विभागास अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे (BDS) तात्काळ परत करण्यात यावी.

९. घरबांधणी अग्रिम मंजुरी आदेश काढतांना सदर सदनिकेचा वा घराचा विमा शासकीय विमा निधीकडेच उतरवावा अशी अट आदेशात नमूद करावी व त्याचे काटेकोरपणे पालन होईल, याची दक्षता घ्यावी. तसेच सदर मंजुरी आदेशाची प्रत विमा संचालक, महाराष्ट्र राज्य, गृहनिर्माण भवन, म्हाडा, २६४, पहिला मजला, वांद्रे (पूर्व ) मुंबई-४०० ०५१ यांनाही माहितीसाठी अग्रेषित करावी.

१०. प्रत्येक नियंत्रक अधिकारी यांनी उद्दीष्ट निहाय केलेला दर महिन्याचा प्रत्यक्ष खर्च हा महालेखापाल यांच्या लेख्यामध्ये दर्शविण्यात आलेल्या खर्चाशी तंतोतंत जुळण्यासाठी http://agmaha.cag.gov.in या वेबसाईटवर दरमहा मासिक खर्चमेळाचे काम ऑनलाईन करण्यात यावे व पडताळणी केलेल्या खर्चाचे मासिक विवरणपत्र रिकंसिलीएशन कंप्लिशन स्लिपसह प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागाच्या कार्यासन ५/२४ कडे परस्पर पाठविण्यात यावे.

११. अर्जदारास ज्या प्रयोजनासाठी अग्रिम मंजूर करण्यात आले आहे, त्याने त्याच प्रयोजनासाठी त्या रकमेचा विनियोग करण्यात आला असल्याच्या विनियोग प्रमाणपत्राची मूळ प्रत मंजुरी अधिका-यांनी त्यांच्या अभिलेखात ठेवून दुय्यम प्रत शासनास पाठवावी. तसेच प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित रक्कम त्वरीत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

१२. यादी क्रमांक २ व ४ मधील अर्जदार मागासवर्गीय असल्याची सेवापुस्तक किंवा जातीच्या दाखल्याच्या आधारे खात्री करुन घेतल्यानंतरच घरबांधणी मंजुरीचे आदेश काढावेत. सदर बाब १५ दिवसात पूर्ण न झाल्यास प्रमाणित रक्कम शासनास परत करण्यात यावी. जेणेकरुन सदर रक्कम इतर पात्र अर्जदारास प्रमाणित करणे शक्य होईल. जर काही कारणास्तव अग्रिम मंजूर करण्यात येत नसेल तर तसे शासनास त्वरीत कळविण्यांत यावे. तसे न झाल्यास यासंदर्भात उद्भवणा-या अनियमिततेस संबंधित नियंत्रक अधिकारी जबाबदार राहतील याची कृपया नोंद घ्यावी.

१३. संबंधित अधिकारी आपल्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेला असल्यास, अर्थसंकल्पिय वित्तीय प्रणालीवर Authorisation Slip काढण्यापूर्वी, त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तद्नंतर त्या अनुषंगाने, प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

१४. घरबांधणी अग्रिमाच्या मुद्दलाची परतफेड 'घरबांधणी अग्रिम -७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादिना कर्जे-२०१, (००)(०१) घर बांधणीसाठी आगाऊ रकमा (७६१०५०१५) या जमा शीर्षाखाली आणि व्याज '००४९-व्याज जमा-८००-इतर जमा (०१) (४४) (i) घरबांधणीसाठी आगाऊ रकमा (००४९१७३८) शासकीय कर्मचा-यांना दिलेल्या कर्जावरील व्याज ४४ (१) घरबांधणी अग्रिम ' या जमा शीर्षाखाली जमा करण्यात यावे.

१५. या शासन निर्णयान्वये प्रमाणित करण्यात आलेल्या अग्रिमावर वित्त विभागाने वेळोवेळी निश्चित केलेल्या/करण्यात आलेल्या दरानुसार व्याजाची आकारणी करण्यात यावी. सोबतच्या यादीतील अर्जदारानी प्रमाणित केलेले घरबांधणी अग्रिम हे संबंधित अर्जदाराच्या कार्यालय प्रमुख /नियंत्रक अधिकारी यांनी केलेल्या शिफारशीवरुन प्रमाणित करण्यात येत आहे. त्यामुळे वित्त विभागाने निश्चित केलेल्या नियमांच्या अधीन राहून अग्रिमाचे वितरण करणे व ती वसूल करणे याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यालय प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांची राहील.

१६. ज्या अधिकारी/कर्मचारी यांना मंजूर करण्यात आलेल्या घरबांधणी अग्रिमाबाबत त्यांच्या सेवापुस्तकात त्याप्रमाणे नोंद घेण्यात यावी. नोंद घेतलेल्या सेवापुस्तकाची पृष्ठाची छांयाकिंत प्रत शासनास सादर करावी.

१७. सर्व नियंत्रक अधिकाऱ्यांनी उपलेखाशीर्षनिहाय व उद्दिष्टनिहाय मासिक खर्चाचे नियोजन करुन अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे ( BDS) तरतुदीचे वाटप आहरण व संवितरण अधिका-यांना करावे. सदर अनुदानातून केला जाणारा खर्च मासिक निधी विवरणपत्रानुसार संगणकीय अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) दरमहा त्या त्या महिन्याचा खर्च त्याच महिन्यांमध्ये करण्यात यावा व तो मंजूर तरतुदींच्या मर्यादेत करण्यात यावा.

१८. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्रमांक जे-५, ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे (योजनेतर/दत्तमत) (२०१)(००)(०१)-घरबांधणीसाठी अग्रिम (७६१० ०४७२) या खाली खर्ची टाकण्यात यावा व २०१८-२०१९ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

१९. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अंदाज २०.१३/प्र.क्र.८५/२०१३ अर्थसंकल्प-३, दि. २५ एप्रिल २०१३ मधील अट क्र. ८ च्या अधिन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

२० सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११४१५२३४४५५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: CN = Akusing Narshi Vasave, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary
Date: 2018.11.14 15:32:00 +05'30'

**( आ. न. वसावे )**

**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :-** विवरणपत्र -'अ' व 'यादी क्र. १,२,३ व ४'

**प्रत,**

१. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२. महाप्रबंधक, (वित्त व अंदाज),उच्च न्यायालय,अपिल शाखा,मुंबई
३. सह सचिव (प्रशा), विधि व न्याय विभा, मंत्रालय, मुंबई

४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (२ प्रती).
५. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१, मुंबई (२ प्रती).
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर (२ प्रती).
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर (२ प्रती).
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१०. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे/रत्नागिरी/जळगाव/सोलापूर/परभणी/अहमदनगर/उस्मानाबाद/अमरावती/भंडारा/
११. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रत्नागिरी/जळगाव/सोलापूर/परभणी/अहमदनगर/उस्मानाबाद/अमरावती/भंडारा/
१२. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग/अर्थसंकल्प ७ व १० मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१३. कार्यासन अधिकारी (कार्या-२ अ, कार्या -२३ व कार्या-२४), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. निवड नस्ती (कार्यासन- पाच), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

| विवरणपत्र "अ" | | | |
|---|---|---|---|
| शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र. घबांअ १२१८/(४)/प्र.क्र. २७ /का. पाच, दि. १४ नोव्हेंबर २०१८ सोबतचे विवरणपत्र (आकडे रुपयात) | | | |
| अ. क्र. | CO Code | मंजूरी /नियंत्रक अधिकारी | प्रमाणित करण्यात आलेले घरबांधणी अग्रीम (रुपये) |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | J००६० | सह सचिव, (प्रशा) विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | १६५५००० |
| २ | J०००२ | महाप्रबंधक, (वित्त व अंदाज),उच्च न्यायालय,अपिल शाखा,मुंबई | २८१४४१६ |
| ३ | J००२८ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे | ३६००००० |
| ४ | J००३१ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, रत्नागिरी | ४३७४०० |
| ५ | J००२१ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जळगाव | २५५००० |
| ६ | J००२७ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सोलापूर | ६३०००० |
| ७ | J००१४ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | ४३६४५५० |
| ८ | J००२२ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर | २१८००४० |
| ९ | J००१७ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, उस्मानाबाद | २८००००० |
| १० | J०००८ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अमरावती | ७००००० |
| ११ | J००३४ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, भंडारा | ७९३१९१ |
| **एकुण रु. दोन कोटी दोन लाख एकोणतीस हजार पाचशे सत्यान्नव फक्त** | | | **२०२२९५९७** |

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: CN = Akusing Narshi Vasave, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary
Date: 2018.11.14 15:32:21 +05'30'

(आ.न.वसावे)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

| यादी क्र.१ अमागास ( वर्ग-१,२,३ चे अधिकारी/कर्मचारी ) | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र. घबांअ १२१८/(४)/प्र.क्र.२७/का. पाच, दि. १४ नोव्हेंबर २०१८ सोबतचे विवरणपत्र (आकडे रुपयात) | | | | | | | | |
| अ.क्र. | अर्जदाराचे नाव | पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | अनुज्ञेय अग्रिम | मंजूर करावयाचे अग्रीम | हप्ता/एक रकमी | शेरा |
| १ | श्री. अभय दि. घुटे | लिपिक टंकलेखक | सह सचिव, विधि व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई | जमीन खरेदी करुन घरबांधणी | २०००००० | ७५५००० | २रा हप्ता४०% | नियमानुसार |
| २ | श्री. राजेंद्र एकनाथ खिल्लारी | सहायक | महाप्रबंधक,(वित्त व अंदाज),उच्च न्यायालय,अपिल शाखा, मुंबई | गृहकर्ज परतफेड | १९२७००० | १८५५५१६ | एकरकमी | नियमानुसार |
| ३ | श्रीमती ए.व्ही.चौधरी-इनामदार | सह दिवाणी न्यायाधिश | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे | गृहकर्ज परतफेड | ३०००००० | ३०००००० | एकरकमी | नियमानुसार |
| ४ | श्री. राकेश वसंत पाटील | लघु लेखक (निम्न श्रेणी ) | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे | घरबांधणी | २०००००० | ६००००० | ३० % पहिला हप्ता | नियमानुसार |
| ५ | श्री. महेंद्र सुभाष कोकाटे | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, रत्नागिरी | घरबांधणी | १४५८००० | ४३७४०० | ३ रा हप्ता ३०% | नियमानुसार |
| ६ | श्री. गणेश मुरलीधर बुर्ले | लघुलेखक (निम्न श्रेणी) | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, उस्मानाबाद | घरबांधणी | २०००००० | १४००००० | २ रा व ३ रा हप्ता ७०%, | नियमानुसार |
| ७ | श्री. संजय जितराम शर्मा | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अमरावती | घरबांधणी | १०००००० | ७००००० | २ रा व ३ रा हप्ता ७०%, | नियमानुसार |
| ८ | श्री. सचिन राजाराम आरबाड | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | घरबांधणी | १४४०००० | १००८००० | २ रा व ३ रा हप्ता ७०%, | नियमानुसार |
| ९ | श्री. संतोष गोंविदराव कडतु | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | घरबांधणी | १४४०००० | ५७६००० | २रा हप्ता४०% | नियमानुसार |
| एकूण - एक कोटी तीन लाख ऐकतीस हजार नऊशे सोळा फक्त | | | | | | १०३३१९१६ | | |

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: CN = Akusing Narshi Vasave, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary
Date: 2018.11.14 15:32:59 +05'30'

(आ.न.वसावे)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

| यादी क्र.२ मागास ( वर्ग-१,२,३ चे अधिकारी/कर्मचारी ) | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र. घबांअ १२१८/(४)/प्र.क्र. २७ /का. पाच, दि. १४ नोव्हेंबर २०१८ सोबतचे विवरणपत्र (आकडे रुपयात) | | | | | | | | |
| अ.क्र. | अर्जदाराचे नाव | पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | अनुज्ञेय अग्रिम | मंजूर करावयाचे अग्रीम | हप्ता/एक रकमी | शेरा |
| १ | श्रीमती. स्नेहा दत्तात्रय फुटाणे | लिपिक टंकलेखक | सह सचिव, (प्रशा) विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | घराचा विस्तार | ९००००० | ९००००० | एकरकमी | नियमानुसार |
| २ | श्रीमती सविता सुधाकर ठाकूर | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जळगाव | घरबांधणी | ८५०००० | २५५००० | ३० % तिसरा हप्ता | नियमानुसार |
| ३ | श्री. सुहास हनुमंत शिरसाठ | बेलिफ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर | घरबांधणी | १०३६८०१ | ३११०४० | ३० % तिसरा हप्ता | नियमानुसार |
| ४ | श्रीमती सुवर्णा मुकूंद बगाडे | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर | घरबांधणी | १२५०००० | ८७५००० | २ रा व ३ रा हप्ता ७०%, | नियमानुसार |
| ५ | श्रीमती ज्योती नितीन गाली | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर | घरबांधणी | १४२०००० | ९९४००० | २ रा व ३ रा हप्ता ७०%, | नियमानुसार |
| ६ | श्री. रफिक मकबूल तांबोळी | बेलिफ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सोलापूर | घरबांधणी | ९००००० | ६३०००० | २ रा व ३ रा हप्ता ७०%, | नियमानुसार |
| ७ | श्री. रत्नाकर नागनाथ साबणे | लघुलेखक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | घरबांधणी | २०००००० | १४००००० | २ रा व ३ रा हप्ता ७०%, | नियमानुसार |
| ८ | श्री. विष्णू पुरभाजी बानायत | बेलिफ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | जमीन खरेदी करुन घरबांधणी | १५२८००० | ६११२०० | ४० %२ हप्ता | नियमानुसार |
| ९ | श्री. प्रविण हरिश्चंद्र अपराध | लघु लेखक (निम्न श्रेणी ) | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, उस्मानाबाद | घरबांधणी | २०००००० | १४००००० | २ रा व ३ रा हप्ता ७०%, | नियमानुसार |
| १० | श्री. जितेंन्द्र लक्ष्मणजी रंगारी | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, भंडारा | घरबांधणी | १९८२९७८ | ७९३१९१ | २ हप्ता ४०%, | नियमानुसार |
| एकुण रु. ऐक्याऐंशी लाख एकोणसत्तर हजार चारशे एकतीस फक्त | | | | | | ८१६९४३१ | | |

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: CN = Akusing Narshi Vasave, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary
Date: 2018.11.14 15:33:19 +05'30'

(आ.न.वसावे)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

| यादी क्र.३ अमागास ( वर्ग-४ चे कर्मचारी ) | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र. घबांअ १२१८/(४)/प्र.क्र. २७/का. पाच, दि. १४ नोव्हेंबर २०१८ सोबतचे विवरणपत्र (आकडे रुपयात) | | | | | | | | |
| अ.क्र. | अर्जदाराचे नाव | पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | अनुज्ञेय अग्रिम | मंजूर करावयाचे अग्रीम | हप्ता/एक रकमी | शेरा |
| १ | श्री. संतोष बाबाराव पिंपळकर | शिपाई | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | घरबांधणी | ११२४५०० | ३३७३५० | ३० % पहिला हप्ता | नियमानुसार |
| एकूण - तीन सदतीस हजार तीनशे पन्नास फक्त | | | | | | ३३७३५० | | |

| यादी क्र.४ मागास ( वर्ग-४ चे कर्मचारी ) | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र. घबांअ १२१८/(४)/प्र.क्र. २७/का. पाच, दि. १४ नोव्हेंबर २०१८ सोबतचे विवरणपत्र (आकडे रुपयात) | | | | | | | | |
| अ.क्र. | अर्जदाराचे नाव | पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | अनुज्ञेय अग्रिम | मंजूर करावयाचे अग्रीम | हप्ता/एक रकमी | शेरा |
| १ | श्री. गणेश बाळाभाऊ दुधे | शिपाई | महाप्रबंधक,उच्च न्यायालय,मुंबई अंतर्गत प्रबंधक(वित्त व अंदाज),उच्च न्यायालय,अपिल शाखा,मुंबई | गृहकर्ज परतफेड | ९५८९०० | ९५८९०० | एकरकमी | नियमानुसार |
| २ | श्री. दिलिप शिवाजीराव लोहोकरे | शिपाई | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | घरबांधणी | १४४०००० | ४३२००० | ३० % पहिला हप्ता | नियमानुसार |
| एकूण – तेरा लाख नव्वद हजार नऊशे फक्त | | | | | | १३९०९०० | | |

Akusing Narshi Vasave

Digitally signed by Akusing Narshi Vasave
DN: CN = Akusing Narshi Vasave, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary
Date: 2018.11.14 15:33:41 +05'30'

(आ.न.वसावे)

सह सचिव, महाराष्ट्र शासन